**महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोगास सन २०२२-२३ या आर्थिक वर्षात माहे मार्च, २०२२ चे वेतन, महागाई भत्ता फरक मार्च-२०२२ व व वेतनावरील बाबींकरिता अनुदान वितरीत करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**अल्पसंख्याक विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांक :- राअआ-२०२२/प्र.क्र.२४/का-९**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
दिनांक :- ११ एप्रिल, २०२२

**वाचा :-**

(१) शासन परिपत्रक, वित्त विभाग क्र. अर्थसं- २०२२/प्र.क्र.४३/अर्थ-३, दि.०४ एप्रिल,२०२२.
(२) महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोगाचे पत्र क्र.राअआ/लेखा/प्र.क्र.०३/का-०४/२०२२-२३, दि.०६/०४/२०२२ चे पत्र व सहपत्र.

**प्रस्तावना :-**

महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोग, मुंबई या कार्यालयातील अधिकारी/कर्मचारी यांच्या वेतन या बाबीकरीता माहे मार्च, २०२२ चे वेतन व महागाई भत्ता फरक मार्च-२०२२ करिता अनुदान उपलब्ध करुन देण्याबाबत उपरोक्त संदर्भ क्र.२ येथील पत्र व सहपत्रान्वये शासनास विनंती केली आहे. त्यानुसार सन २०२२-२३ या आर्थिक वर्षातील अर्थसंकल्पीत केलेल्या निधी मधून महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोग, मुंबई या कार्यालयातील अधिकारी / कर्मचारी यांच्या वेतन या बाबीकरीता माहे मार्च, २०२२ चे वेतन व महागाई भत्ता फरक मार्च-२०२२ करिता अनुदान वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोग, मुंबई या कार्यालयासाठी सन २०२२-२३ या आर्थिक वर्षामध्ये "२२३५, सामाजिक सुरक्षा व कल्याण, ०२ समाज कल्याण, २०० इतर कार्यक्रम (०१) (१६) राज्य अल्पसंख्याक आयोग २२३५ ए २४९ (अनिवार्य), ३६ सहायक अनुदाने (वेतन)" या लेखाशिर्षा अंतर्गत एकूण रु.८३,९२,०००/- (एकूण अक्षरी रुपये त्र्याऐंशी लक्ष ब्याण्णव हजार फक्त) इतका निधी अर्थसंकल्पीत करण्यात आला आहे.

२. उपरोक्त संदर्भ क्र.१ येथील वित्त विभाग, शासन परिपत्रक दि.०४ एप्रिल,२०२२ मधील मार्गदर्शक सूचनांनुसार सद्यस्थितीत वेतन या बाबीकरीता एकूण अर्थसंकल्पीत निधीच्या १०% च्या मर्यादेत म्हणजेच एकूण रु.८,३९,२००/- (अक्षरी रुपये आठ लाख एकोणचाळीस हजार दोनशे फक्त) इतका निधी बिम्स प्रणालीवर उपलब्ध करुन दिला आहे. त्यानुसार सद्यस्थितीत वित्त विभागाने उपलब्ध करुन दिलेल्या रु.८,३९,२००/- (अक्षरी रुपये आठ लाख एकोणचाळीस हजार दोनशे फक्त) इतका निधी महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोगास वेतनावरील खर्चाकरीता मागणी क्रमांक झेड ई ०१ २२३५, ए- २४९ अनिवार्य (३६) सहायक अनुदान (वेतन), सन २०२२-२३ या आर्थिक वर्षात **माहे** मार्च, २०२२ चे वेतन, महागाई भत्ता फरक मार्च-२०२२ व व वेतनावरील बाबींकरिता अनुदान वितरीत करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

३. महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोग, मुंबई या कार्यालयासाठी सन २०२१-२२ या आर्थिक वर्षात रु.५२,३५,१६५/- (अक्षरी एकूण रुपये बावन लक्ष पस्तीस हजार एकशे पासष्ट फक्त) इतके अनुदान वितरीत करण्यात आले होते. आयोगाकडून सदर अनुदानापैकी रु.५२,३२,२९८/- (अक्षरी एकूण रुपये बावन लक्ष बत्तीस हजार दोनशे अठ्ठयान्नव फक्त) इतके अनुदान खर्च झाले असून रु.२,८६७/- (रुपये दोन हजार आठशे सदुसष्ट फक्त) इतके शिल्लक अनुदान चलनाद्वारे आरबीआय बँकेमध्ये भरणा करण्यात आले आहे असे शासनास कळविले आहे. खर्च झालेल्या अनुदानाचे आयोगाने उपयोगिता प्रमाणपत्राची प्रत शासनास सादर केली आहे. सन २०२२-२३ या आर्थिक वर्षामध्ये मार्च २०२२ चे वेतन, महागाई भत्ता फरक मार्च-२०२२ व वेतनावरील बाबींकरिता एकूण रु.८,३९,२००/- (अक्षरी रुपये आठ लाख एकोणचाळीस हजार दोनशे फक्त) इतके अनुदान,

३६ सहायक अनुदाने (वेतन) या उद्दिष्टाखाली खालील विवरणपत्रात दर्शविल्या प्रमाणे सचिव, महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोग, मुंबई यांच्याकडे वित्त विभागाच्या अटी व शर्तीनुसार तपशिलवार माहिती सादर करण्याच्या अटीस अधीन राहून सुपूर्द करण्यात येत आहे.

| **अ. क्र.** | **तपशीलवार लेखाशीर्ष** | **सन २०२२-२३ साठी अर्थसंकल्पीत अनुदान (एकूण रुपये)** | **(माहे मार्च, २०२२ चे वेतन, महागाई भत्ता फरक मार्च-२०२२ व व वेतनावरील बाबींकरिता (एकूण रुपये)** |
|---|---|---|---|
| **१** | **२** | **३** | **४** |
| १ | ३६,सहायक अनुदाने (वेतन) | रु.८३,९२,०००/- | रु.८,३९,२००/- |
| | **एकूण** | **रु.८३,९२,०००/-** | **रु.८,३९,२००/-** |
| | **एकूण** | **(अक्षरी रुपये आठ लाख एकोणचाळीस हजार दोनशे फक्त)** | |

४. सदर तरतूद सचिव, महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोग, मुंबई यांच्याकडे सुपूर्द करण्यात येत असून याकरिता, अवर सचिव, महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोग, मुंबई हे आहरण व संवितरण अधिकारी तर सचिव, महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोग, मुंबई हे नियंत्रक अधिकारी म्हणून काम पाहतील. महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोगाने सन २०२२-२३ च्या मासिक निधी विवरणपत्रात दर्शविल्याप्रमाणे आयोगाच्या कार्यालयाचा वेतनावरील खर्च विहित मर्यादेत राहील याची दक्षता घेण्यात यावी. वेतन या लेखाशिर्षांतर्गत वितरीत करण्यात आलेल्या निधी त्याच उदिष्टासाठी खर्च करण्यात यावा. या आदेशान्वये वितरीत करण्यात आलेल्या निधीतून केलेल्या खर्चाचा तपशील, उपयोगिता प्रमाणपत्र Utilization Certificate शासनांस तात्काळ सादर करावे. तसेच संदर्भ क्र. (१) मधील वित्त विभागाच्या शासन परिपत्रकान्वये विहीत अटी व तरतुदींचे काटेकोरपणे पालन महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोग, मुंबई यांनी करावे.

५. उपरोक्त निधी "मागणी क्र. झेडई -१, २२३५, सामाजिक सुरक्षा व कल्याण, ०२ समाज कल्याण, २०० इतर कार्यक्रम (०१) (१६) राज्य अल्पसंख्याक आयोग २२३५ ए २४९ (अनिवार्य), ३६, सहायक अनुदाने (वेतन)" या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

६. "सदर शासन निर्णय वित्तीय अधिकार नियम पुस्तिका-१९७८ भाग पहिला, वित्त विभाग, शासन निर्णय क्र. विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम, दि.१७ एप्रिल, २०१५ अन्वये प्रशासकीय विभागास प्राप्त झालेल्या अधिकारांतर्गत किंवा त्या त्या विभागास वेळोवेळी वित्तीय अधिकार नियम पुस्तिका भाग -२ अन्वये प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानुसार तसेच शासन परिपत्रक, वित्त विभाग क्र. अर्थसं- २०२२/ प्र.क्र.४३/अर्थ-३, दि.०४ एप्रिल,२०२२ मधील अटींची तसेच सोबतच्या परिशिष्टामधील सर्व बाबींची पुर्तता करण्याच्या अटीस अनुसरून सदर शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे."

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२२०४११११७०६८११४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

DINESH MADHAVRAO SONAVANE

Digitally signed by DINESH MADHAVRAO SONAVANE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=MINORITY DEVELOPMENT DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra,
2.5.4.20=9cabb099fd0576208f4caa310d2e7860201ab5363a2133e0927ff26c0f016fdf, pseudonym=1F9A10571D88646ED6CD168DADBFEDACC3DD2F35, serialNumber=6ADB2BDBBD3BD651A8ADE80686E4AEA66DAA5512EA788889AF1515751ABC0181, cn=DINESH MADHAVRAO SONAVANE
Date: 2022.04.11 11:18:46 +05'30'

**( दि. मा. सोनवणे )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रति,**

१. सचिव, महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोग, मुंबई
२. महालेखापाल-१ (लेखा परीक्षा /लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र राज्य, मुंबई.

३. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
४. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,
५. अवर सचिव, ( व्यय-४), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-४०००३२
६. कक्ष अधिकारी, (का-७) , अल्पसंख्यांक विकास विभाग, मंत्रालय, मुंबई-४०००३२
७. निवडनस्ती (कार्यासन-९).